राष्ट्रीय आरोग्य अभियान-
सन २०२०-२१ चा प्रकल्प अंमलबजावणी आराखडा (PIP),
FMR Code ३.१.३.२: Support provisions to ASHA (Uniform)
**आरोग्यवर्धिनी जिल्ह्यामधील आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तकांसाठी स्मार्ट फोनची खरेदी निविदा प्रक्रियेद्वारे करण्यास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२०/प्र.क्र.२६/आरोग्य -७

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २७ ऑगस्ट, २०२०.

**वाचा :-**

१. सहसंचालक (अतांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्र.राआअ /प्रशासकीय मान्यता/स्मार्ट फोन/१२४१०-४११/२०२०, दिनांक १५.०६.२०२०.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांची मान्य टिप्पणी दिनांक ०९.०६.२०२०.
३. सहसंचालक (अतांत्रिक),राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई यांचे पत्र क्र.राआअ /स्मार्ट फोन खरेदी/४५७८३/२७८९४-८९५/२०२०, दिनांक २२.०७.२०२०.

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील मंजूर कृती आराखडयामधील मंजुर अनुदानातून FMR Code ३.१.३.२ अंतर्गत आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तकांकरीता ४५७८३ स्मार्ट फोन खरेदीसाठी प्रती स्मार्ट फोन रु.८०००/- याप्रमाणे अंदाजित रक्कम रु.३६६२.६४ लक्ष इतक्या रकमेच्या खर्चाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यात आशा स्वयंसेविका योजनेची अंमलबजावणी सुरु असून आशा स्वयंसेविका मार्फत आरोग्य विभागाच्या विविध कार्यक्रमाची अंमलबजावणी सुरु आहे. तरी सद्यस्थितीत, आरोग्य विभागाने काही सॉफ्टवेअर तयार केलेले आहे. सदर सॉफ्टवेअरमध्ये Real Time Data भरणे आवश्यक आहे. जेणेकरुन कार्यक्रमाच्या सद्यस्थितीबाबत त्वरीत माहिती उपलब्ध होऊन आवश्यक त्या उपाययोजना करणे शक्य होणार आहे. सबब, आरोग्यवर्धिनी जिल्ह्यांमधील आशा स्वयंसेविका

व गटप्रवर्तकांकरीता ४५७८३ स्मार्ट फोन खरेदीसाठी प्रती स्मार्ट फोन रु.८०००/- याप्रमाणे अंदाजित रक्कम रु.३६६२.६४ लक्ष इतक्या रकमेच्या खर्चाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.:-

**विवरणपत्र-प्रस्तावित खरेदीचा तपशिल**

| Sr. No. | Name of the Item | Unit Cost (In Rs. Approx.) | Qty. | Total Amt. (In Lakhs) |
|---|---|---|---|---|
| 1 | Smart Phone (For ASHA & ASHA facilitators in HWC Districts) | 8000 | 45783 | 3662.64 |
| | | | **Total** | **3662.64** |

०२. प्रकल्प अंमलबजावणी आराखडा २०२०-२१, FMR Code ३.१.३.२ अंतर्गत आरोग्यवर्धिनी जिल्ह्यांमधील आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक यांच्या स्मार्ट फोन खरेदीसाठी रु.३६६२.६४ लक्ष एवढी तरतूद करण्यात आली आहे. त्यामधून सदर बाबीवर होणारा खर्च भागविण्यात यावा.

०३. सदर प्रशासकीय मान्यता ही पुढील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.:-

१. सदर बाबींच्या खरेदीची आवश्यकता /मागणी याची शहनिशा/खातरजमा करण्यात यावी. तदनंतरच सदर बाबींची निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२. सदर स्मार्ट फोन या बाबीची खरेदी माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या (DIT) मार्गदर्शक सूचनांनूसार निविदा प्रक्रियेद्वारे करण्यात यावी.

३. सदरहू बाबींचे विनिदेश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. सदरहू बाबींचे तांत्रिक विनिदेश ( Technical Specifications) संबंधित तज्ञांनी ( तांत्रिक समिती /अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिदेशानुसारच असावेत.तसेच,सदर तांत्रिक विनिदेश (Technical Specifications) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रीतीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. प्रकल्प अंमलबजावणी आराखड्यात (PIP) मंजूर असलेल्या बाबींच्या तांत्रिक विनिदेशानुसार मागणीपत्र पाठविण्याची जबाबदारी संबंधित कार्यक्रम प्रमुखांची राहील.प्रस्तावात समाविष्ट बाबींवरच निविदा प्रक्रिया करण्यात यावी.

४. सदर बाबींचे अत्यंत सुस्पष्ट व सविस्तर विनिर्देश (Specifications) तयार करण्यात यावेत, आणि त्याचा निविदा प्रक्रियेत समावेश करण्यात यावा.

५. शासन निर्णय,उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-३/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ अन्वये प्रसिद्ध करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपद्धतीची सुधारित नियमपुस्तिका यामधील तरतुदीनुसार विहित निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

६. GEM Portal, Online विक्रेता येथील दर पडताळून न्युनत्तम अंदाजित दर निविदेत नमूद करण्याची दक्षता खरेदी करणाऱ्या कार्यक्रम प्रमुखांनी घ्यावी.
७. खरेदी प्रक्रीयेअंती दर निश्चित करण्यात यावा.सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबबत आणि संबधित पुरवठादाराने या बाबींचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.
८. खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.
९. खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.
१०.सदरहू बाबींसाठी होणारा खर्च हा सन २०२०-२१ च्या मंजूर प्रकल्प अंमलबजावणी आराखड्यातील FMR Code ३.१.३.२ अंतर्गत रुपये ३६६२.६४ लक्ष ह्या अनुदानातून भागविण्यात यावा.
११.तसेच या बाबींची द्विरुक्ती (Duplication) होणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच याबाबत संपूर्ण जबाबदारी कार्यक्रम प्रमुखांची राहील.
१२.संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.
१३.शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनिमय, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८,भाग पहिला, उपविभाग-२ मधील अ.क्र.४,नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.
१४.निविदा प्रक्रिया पूर्ण झाल्यावर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.

०४. उपरोक्त अनुक्रमांक १ ते १३ येथील अटींची पूर्तता व खरेदी नियमानुसार व आवश्यकतेनुसार आहे हे सुनिश्चित करण्याची जबाबदारी आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई व सम्बन्धित कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

०५. शासन निर्णय,वित्त विभाग, क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनिमय, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग-२ मधील अ.क्र.४, नियम क्र.७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामुग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजुरी देण्यासाठी प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८२७१२४७१३६७१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind Raghunath Kulkarni

Digitally signed by Milind Raghunath Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, cn=Milind Raghunath Kulkarni
Date: 2020.08.27 13:13:42 +05'30'

**( मिलिंद कुळकर्णी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत:-

१. आयुक्त,आरोग्य सेवा तथा अभियान संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान संचालक,मुंबई,
२. संचालक,आरोग्यसेवा,मुंबई,
३. संचालक (वित्त व लेखा),राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई,
४. अतिरिक्त संचालक,राज्य कुटुंब कल्याण कार्यालय,पुणे,
५. सर्व सहसंचालक ( आरोग्य सेवा आयुक्तालयामार्फत )
६. उपसंचालक, सर्व मंडळ कार्यालये,
७. सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
८. जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
९. निवड नस्ती (कार्यासन-आरोग्य-७).